कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर "ब्रेक दी चेन" अंतर्गत नाट्यगृहे पुन्हा सुरु करण्याबाबत मार्गदर्शक तत्वे.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ८२२० / प्र.क्र. २११ (भाग-१) /सां.का.४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार ), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ ऑक्टोंबर, २०२१

**वाचा :** १) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. संकीर्ण ८२२०/प्र.क्र. २११/ सां.का.४, दिनांक ५ नोव्हेंबर, २०२०

२) शासन आदेश सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. कोरोना २०२१/प्र.क्र.३६६/आ-५, दिनांक ११ ऑगस्ट, २०२१, दिनांक १६ ऑगस्ट, २०२१ व दिनांक २४ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना :**

मा. मुख्यमंत्री महोदयांनी राज्यातील चित्रपटगृहे आणि नाटयगृहे दिनांक २२ ऑक्टोबर, २०२१ नंतर आरोग्याचे नियम पाळून खुले करण्यास परवानगी देण्यात येईल, अशी घोषणा दिनांक २५ सप्टेंबर, २०२१ रोजी केली आहे. सदर घोषणेच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील आदेशांमध्ये कोविड-१९ विषाणूंच्या प्रादुर्भावास प्रतिबंध करण्यासाठी नमूद केलेल्या प्रतिबंधक उपाययोजनांचे पालन करण्याच्या अधीन नाट्यगृहे नियंत्रित पध्दतीने सुरु करण्याकरीता मार्गदर्शक तत्व निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत, शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर राज्यातील नाट्यगृहे, या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट-अ (Annexure-A) व परिशिष्ट १ मधील मार्गदर्शक तत्वांच्या अधिन राहून, दिनांक २२ ऑक्टोबर, २०२१ पासून नियंत्रित स्वरुपात सुरु करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. ही परवानगी देण्यामागील शासनाचा उदात्त हेतू विचारात घेऊन सर्व संबंधितांनी नाट्यगृहांचे परिचालन कोविड-१९ संदर्भातील केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या कोणत्याही निर्बंधांचा भंग होणार नाही अशा पध्दतीने करणे आवश्यक आहे. या मार्गदर्शक तत्वांचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधितांविरुध्द नियमानुसार कारवाई करण्यात येईल.

३. कोविड-१९ विषाणूंच्या प्रादुर्भावास प्रतिबंध करण्यासाठी शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील बंधनकारक असणाऱ्या सूचना या प्रकरणीही लागू राहतील.

तसेच या मार्गदर्शक तत्वांच्या अनुपालनाचा व त्याच्या परिणामकारकतेचा आढावा घेऊन त्यात आवश्यकतेनुसार यथोचित बदल करण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग आणि महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन प्रभाग) यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११०१२११०६३३६९२३ असा आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(विलास रा. थोरात)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्र - परिशिष्ट- "अ", Annexure-A व परिशिष्ट-१, Annexure-1

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. सभापती विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव
७) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
८) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव
९) मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव
१०) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
११) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१४) संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५) आयुक्त, महानगरपालिका - (सर्व)
१६) जिल्हाधिकारी - (सर्व)
१७) पोलिस अधिक्षक - (सर्व)
१८) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत सर्व संबंधित.
१९) सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख
२०) निवड नस्ती - सां.का.४

परिशिष्ट - अ

(शासन निर्णय क्रमांक संकीर्ण -८२२०/प्र.क्र.२११(भाग-१)/सां.का.४, दिनांक-११ ऑक्टोंबर,२०२१ सोबतचे परिशिष्ट-अ)

## महाराष्ट्र राज्यामध्ये नाट्यगृहे पुन्हा सुरू करण्याबाबतची प्रमाणित कार्यचालन कार्यपद्धती

भाग १

प्रमाणित कार्यचालन पध्दती

१. व्याप्ती

१.१. कोविड-१९ च्या प्रसारास प्रतिबंध घालण्याच्या दृष्टीने, नाट्यगृहांमध्ये नाटक सादरीकरणाच्या दरम्यान निश्चितपणे अंमलात आणावयाच्या विनिर्दिष्ट उपाययोजनांबरोबरच, अंगीकारावयाच्या विविध सर्वसामान्य सावधगिरीच्या उपाययोजनांबाबतची प्रमाणित कार्यचालन कार्यपद्धती, या दस्तऐवजामध्ये नमूद केलेली आहे.

१.२ प्रतिबंधित क्षेत्रात नाट्यगृह पुन्हा सुरू करण्याकरिता परवानगी दिली जाणार नाही.

१.३ महाराष्ट्र शासनाचा महसूल व वन विभाग, आपत्ती व्यवस्थापन विभाग, मदत व पुनर्वसन विभाग तसेच सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या प्रचलित मार्गदर्शक तत्त्वांनुसार नाट्यगृहांचे नियमन केले जाईल.

१.४ स्थानिक कोविड-१९ साथरोग परिस्थिती विचारात घेऊन जिल्हाधिकारी संबंधित शासकीय यंत्रणांशी विचारविनिमय करुन उपरोक्त निर्बंधामध्ये वाढ करु शकतील.

२. नाट्यगृहे पुन्हा सुरू करण्याबाबतची प्रमाणित कार्यचालन कार्यपद्धती

क) नाट्यगृह / रंगभूमीची परिवास्तू (देखाव्यांसहित)

१. सुरक्षित अंतराबाबतच्या मानकांनुसार, प्रवेशद्वारे व समुचित ठिकाणी जमिनीवर खुणा आखण्यात याव्यात.

२. नेमलेल्या व्यक्तींना पडदा, पडद्यामागील वस्तू ,इत्यादी हाताळण्याची परवानगी देण्यात येईल.

३. नाट्य कलाकारगण आणि कर्मचारीवृंद यांनी नियमितपणे त्यांची स्वत:ची वैद्यकीय तपासणी करून घ्यावी, अशी सूचना देण्यात येत आहे/अशी शिफारस करण्यात येत आहे.

४. सर्व देखाव्यांची व कलाकारांसाठी असलेल्या कक्षांची दररोज धूम्र फवारणी करण्यात आली पाहिजे.

५. देखावे, प्रसाधनगृहे आणि रंगभूषा कक्ष यांच्या नियगित स्वच्छतेबाबत वेळापत्रक आखावे, स्वच्छतागृहांची वेळेवर स्वच्छता केल्याची खातरजमा करावी.

६. मुखपट्ट्या आणि मुख संरक्षक कवच (फेस शिल्ड) लावणे बंधनकारक आहे, आणि नाटय कर्मचारीवृंदाला हात स्वच्छ करण्यासाठी निर्जंतुक द्रव उपलब्ध करून द्यावे. कोणत्याही अतिथींना मग ते कोणीही असोत- कलाकारांच्या कक्षांमध्ये जाण्यारा अजिबात परवानगी दिली जाणार नाही.

७. ज्या कोणाकडून, जी साधने (संगीत व्यवस्था / लॅपटॉप / माइक / प्रकाश योजना इत्यादी) हाताळली जातील त्यांनीच ती वापरावीत, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

८. नाट्यगृहांची नियमितपणे स्वच्छता/ निर्जंतुकीकरण/ धूम्र फवारणी, इत्यादी करण्यासाठी, सर्व नाट्यगृह व्यवस्थापनांनी उपाययोजना करणे बंधनकारक आहे.

ख) कलाकारांचे व्यवस्थापन

१. कोणत्याही अतिथीस, नाटकाच्या प्रयोगापूर्वी किंवा प्रयोगानंतर कलाकाराला किंवा इतर नाट्य कर्मचारीवर्गाला रंगमंचावर / कलाकारांच्या कक्षांमध्ये जाऊन भेटण्याची परवानगी दिली जाणार नाही.

२. रंगभूषाकाराने सत्रापूर्वी आणि सत्रानंतर त्याचे हात साबणाने / निर्जंतुक द्रवाने (Sanitizer) धुतले पाहिजेत.

३. रंगभूषेच्या रंगाचे मिश्रण, वापरल्यानंतर फेकून देता येण्याजोग्या रंगपाटीवर करावे आणि शक्यतो, प्रत्येक अभिनेत्यासाठी केवळ एका ब्रशचा , रंग लावण्याच्या साधनाचा वापर करावा. शक्यतो प्रत्येक अभिनेत्यासाठी, ब्रश / कंगवे वेगळे राखून ठेवावेत, जेणेकरून एकमेकांचे ब्रश /कंगवे दूषित होणार नाहीत.

४. केसांचे ब्रश व कंगवे आणि पुन्हा वापरता येण्याजोगे रंगभूषेचे ब्रश योग्य निर्जंतुक द्रावणाने स्वच्छ करण्यात यावेत.

५. अभिनेत्याने (अभिनेत्यांनी) त्याची स्वतःची रंगभूषा / केशभूषा स्वत:च करून येण्याबाबत विचार केला जावा.

६. व्यक्ती-व्यक्तींच्या संपर्काच्या दरम्यान केशभूषा व रंगभूषा करताना, व्यक्तिगत संरक्षक साधने (पीपीई) व अशी सूचना देण्यात येत आहे.

७. रंगभूषाकार किंवा केशभूषाकार यांनी मुख संरक्षक कवच (face-shields) लावले पाहिजे.

८. रंगभूषा कक्ष किमान ६ फूट दूर असला पाहिजे.

९. वापरल्यानंतर फेकून देता येण्याजोग्या रंगभूषा संचाचा आणि ब्रशचा वापर करण्याची आणि प्रत्येक वापरानंतर त्या संचाची विल्हेवाट लावण्याची सूचना देण्यात येत आहे.

१०. प्रत्येक वापरापूर्वी आणि वापरानंतर सर्व ध्वनी व प्रकाश योजनेच्या सामग्रीचे निर्जंतुकीकरण करण्यात यावे.

११. सर्व कलाकारांनी स्वतःच्या आरोग्याची स्वत:च देखरेख करावी आणि कोणत्याही आजाराबाबत तात्काळ राज्य व जिल्हा मदत क्रमांकांवर (हेल्पलाईन) कळवावे.

भाग २

१. महाराष्ट्र राज्यामध्ये नाट्यगृहे पुन्हा सुरू करण्याबाबतची सर्वसाधारण मार्गदर्शक तत्त्वे

सर्वसामान्य उपाययोजना यामध्ये, कोविड-१९ च्या संसर्गाचा धोका कमी व्हावा याकरिता अनुसरावयाच्या सार्वजनिक आरोग्यविषयक उपाययोजनांचा समावेश होतो. या उपाययोजनांचे सर्वांनी (कर्मचारी तसेच भेटी देणारे) नेहमीच पालन करणे आवश्यक आहे.

या उपाययोजनांमध्ये पुढील बाबींचा अंतर्भाव आहे:

एक. प्रेक्षागाराबाहेर, सामाईक क्षेत्रांमध्ये आणि प्रतीक्षा क्षेत्रांमध्ये नेहमी किमान सहा फूट इतके पर्याप्त सुरक्षित अंतर राखावे.

दोन. नेहमी तोंडाला मुखपट्टी(मास्क) बांधणे /कपड्याने तोंड झाकणे (मुखावरण लावणे) अनिवार्य आहे.

तीन. परिवास्तुच्या प्रवेशाच्या व निर्गमनाच्या मार्गावर तसेच सामाईक क्षेत्रांमध्ये , हात स्वच्छ करण्यासाठी, प्राधान्याने हाताचा-स्पर्शरहित पद्धतीने घेता येणारे निर्जंतुक द्रव उपलब्ध ठेवावे.

चार.    श्वसनविषयक शिष्टाचाराचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. खोकताना/ शिंकताना प्रत्येकाने स्वतःचे तोंड व नाक टिप कागदाने (टिश्यू पेपर) / हात रुमालाने /कोपराने पूर्णपणे झाकून घेणे आणि वापरलेल्या टिप कागदाची (टिश्यू पेपर) योग्य प्रकारे विल्हेवाट लावणे आवश्यक आहे.

पाच.    सर्वांनी स्वतःच्या आरोग्याची स्वत:च देखरेख करावी आणि कोणत्याही आजाराबाबत तात्काळ राज्य व जिल्हा मदत क्रमांकांवर (हेल्पलाईन) कळवावे.

सहा.   थुंकण्यास सक्त मनाई असेल.

सात.  आरोग्य सेतू उपयोजन (ॲप) सुसंगत साधनांवर स्थापित (installed) करून ते दिवसभर सुरू ठेवावयाचे आहे. तसेच बालकलाकारां व्यतिरिक्त सर्व कलाकार / कर्मचारी वर्गाचे संपूर्ण कोविड प्रतिबंधक लसीकरण ( दोन डोस व दुसऱ्या डोस नंतर १४ दिवसांचा कालावधी पूर्ण झालेला असणे आवश्यक असेल. ) झालेले असणे आवश्यक असेल. बाल कलाकारांची आरोग्य सेतू ॲप वरील आरोग्य स्थिती सुरक्षित असणे आवश्यक राहील तसेच त्यांची आरोग्य दृष्ट्या वारंवार तपासणी होणे आवश्यक राहील. तसेच प्रेक्षकांचे कोविड प्रतिबंधक लसीकरण झाले असणे अथवा आरोग्य सेतुवरील त्यांची आरोग्य स्थिती "सुरक्षित" अशी दर्शविलेली असणे आवश्यक राहील.

१.१   प्रवेश व निर्गम द्वारे

अ.   प्रवेश द्वारांवर कर्मचाऱ्यांची/भेटी देणाऱ्यांची तापमान तपासणी करण्यात यावी. लक्षणे नसलेल्या व्यक्तींनाच केवळ परिवास्तूत प्रवेश करण्याची मुभा देण्यात येईल.

आ.   सर्व प्रवेश द्वारांवर आणि कार्यक्षेत्रांमध्ये हात निर्जंतुक करण्याची सोय उपलब्ध करण्यात यावी.

इ.   प्रेक्षागाराच्या आणि परिवास्तूच्या प्रवेशाच्या आणि निर्गमनाच्या ठिकाणी प्रेक्षकांकरिता रांगेसाठी आखीव खुणा करण्यात येतील.

ई.   गर्दी होऊ नये म्हणून, लोकांना, एकमेकांमध्ये अंतर ठेवून रांगेने बाहेर सोडण्यात यावे.

उ.   एखाद्या मल्टिप्लेक्समध्ये विविध पडद्यांवर तसेच एकल पडद्यावर लागोपाठच्या प्रदर्शनांच्यामध्ये पुरेसा कालावधी ठेवण्यात येईल, जेणेकरून प्रेक्षक रांगेतून, एकमेकांमध्ये अंतर ठेवून आत जाण्याची व बाहेर पडण्याची सुनिश्चिती करता येईल.

ऊ.   गर्दी टाळण्यासाठी एकापेक्षा अधिक प्रवेश व निर्गम द्वारे वापरण्यात यावीत.

१.२   आसन व्यवस्था

अ. नाट्यगृहांचा वापर त्यांच्या एकूण आसन क्षमतेच्या ५० टक्क्यांपेक्षा अधिक करण्यात येणार नाही.

आ. नाट्यगृहांच्या प्रेक्षागारामधील आसन व्यवस्था ही , पर्याप्त सुरक्षित अंतर राखले जाईल अशा प्रकारे केली असली पाहिजे . जोडपत्र एक मध्ये आदर्श आसन व्यवस्थेचा नमुना दिलेला आहे.

इ. तिकीट आरक्षणाव्या वेळी ( ऑनलाईन आरक्षणाच्या, आणि तिकीट खिडकीवरील तिकिटांच्या विक्रीच्या, अशा दोन्ही वेळी), जी आसने वापरावयाची नसतील त्यांवर "आसनांचा वापर करू नये" अशी स्पष्ट खूण करण्यात येईल.

टीप:- नाट्यगृहांमध्ये "आसनांचा वापर करू नये" अशी खूण केलेल्या आसनांचा लोकांनी वापर करू नये म्हणून, त्यांवर एकतर फित लावण्यात येईल किंवा फ्लोरोसेंट मार्करने खूण करण्यात येईल, जेणेकरून नेहमीच पर्याप्त सुरक्षित अंतराची सुनिश्चिती होईल.

## १.३. सुरक्षित अंतराबाबतची मानके

अ. वाहनतळ परिसरातील आणि परिवास्तूच्या बाहेरील गर्दीचे योग्य व्यवस्थापन करताना, सुरक्षित अंतराबाबतच्या मानकांचे यथायोग्यपणे पालन केले जात असल्याची सुनिश्चिती करण्यात येईल.

आ. उद्वाहनांमध्ये सुरक्षित अंतराबाबतच्या मानकांचे यथायोग्यपणे पालन करून, लोकांची संख्या मर्यादित ठेवण्यात येईल.

इ. मध्यंतरामध्ये सामाईक जागा, व-हांडे (लॉबी) आणि प्रसाधनगृहे या ठिकाणी गर्दी होऊ नये याची दक्षता घेतली पाहिजे. प्रेक्षकांनी मध्यंतरामध्ये ये-जा करणे टाळावे याकरिता, त्यांना प्रोत्साहित करण्यात यावे. प्रेक्षागारातील वेगवेगळ्या रांगांमध्ये बसलेल्या प्रेक्षकांना एकमेकांमध्ये अंतर राखून ये-जा करता यावी याकरिता दीर्घकाळाचे मध्यंतर ठेवता येईल.

## १.४ तिकीट आरक्षण व रक्कम भरणा पद्धती

अ. तिकिटे देणे/त्यांची पडताळणी करणे/त्यांची रक्कम भरणे याकरिता तसेच, खाद्य पदार्थ व पेये यांकरिता ऑनलाइन आरक्षण, इ-वॉलेट, क्यूआर कोड स्कॅनर, इत्यादींसारख्या डिजिटल ,रांपर्करहित व्यवहारांना अधिक प्राधान्य दिले पाहिजे.

आ. संपर्काचा (व्यक्तीचा) शोध घेणे सुकर व्हावे म्हणून, तिकीट आरक्षण करतेवेळी संपर्क क्रमांक नोंदवून घेण्यात येईल.

इ. तिकीट कार्यालयात (बॉक्स ऑफिस)) तिकीट खरेदी दिवसभरासाठी सुरू ठेवण्यात येईल, तसेच तिकीट विक्री खिडक्यांवरील गर्दी टाळण्यासाठी आगाऊ तिकीट आरक्षण उपलब्ध करून देण्यात येईल.

ई. प्रत्यक्षात खिडकीवर तिकीट काढतेवेळी गर्दीला आळा घालण्यासाठी, पर्याप्त सुरक्षित अंतराबाबतच्या मानकांचे पालन करून,तिकीट कार्यालयात पुरेशा प्रमाणात खिडक्यांची व्यवस्था करण्यात येईल.

उ. तिकीट कार्यालयात रांगेचे व्यवस्थापन करताना, सुरक्षित अंतर ठेवण्याच्या दृष्टीने, जमिनीवर खुणा (फ्लोअर मार्कर्स) करण्यात येतील.

## १.५. परिवास्तुचे निर्जंतुकीकरण करणे.

अ. संपूर्ण परिवास्तू, सामाईक सुविधा यांचे तसेच लोकांकडून सामाईकपणे हाताळल्या जाणाऱ्या सर्व गोष्टी, जसे की, दांडे(handles), कठडे(railing) इत्यादींचे वारंवार निर्जतुकीकरण केल्याची खात्री करण्यात येईल.

आ. प्रत्येक नाट्यप्रयोगानंतर प्रेक्षागाराचे निर्जंतुकीकरण करण्यात येईल.

इ. तिकीट कार्यालय, खाद्य-पेयपदार्थ विक्री स्थळे, कर्मचाऱ्यांचे वैयक्तिक चीजवस्तूंचे खण, स्वच्छतागृहे, सार्वजनिक जागा आणि अंतर्गत कामकाज पाहणारे कार्यालय (back office) क्षेत्रे यांची नियमित स्वच्छता व निर्जंतुकीकरण केल्याची खात्री करण्यात येईल.

ई. निर्जंतुकीकरण करणा-या कर्मचारीवर्गाच्या सुरक्षिततेसाठी उपाय योजण्यात येतील, जसे की, हातमोजे, बूट, मुखपट्टया,व्यक्तिगत संरक्षक साधने( पीपीई) इत्यादींच्या संयुक्तिक वापरासाठी पर्याप्त तरतुदी करण्यात येतील.

उ. कोणतीही व्यक्ती कोरोनाबाधित आढळल्यास, परिवास्तुचे निर्जंतुकीकरण हाती घेण्यात येईल.

## १.६. कर्मचाऱ्यांशी संबंधित उपाययोजना

अ. कामाच्या सर्व ठिकाणी कर्मचाऱ्यांनी मुखावरण (फेस कव्हर) लावणे बंधनकारक असून अशा मुखावरणांचा पुरेसा साठा उपलब्ध करून ठेवण्यात यावा.

आ. वयस्क कर्मचारी, गर्भवती महिला कर्मचारी व वैद्यकीय उपचाराधीन कर्मचारी अशा, अधिक जोखीम असणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांनी जास्त खबरदारी घ्यावी. अशा कर्मचाऱ्यांना

लोकांशी थेट संपर्क आवश्यक असणारी व लोकांसमोर जावे लागणारी कामे विशेष करून देण्यात येऊ नयेत.

इ. कामाच्या ठिकाणी सुरक्षितता राखण्याच्या दृष्टीने अधिकाधिक सजग राहण्याचा भाग म्हणून, सर्व कर्मचाऱ्यांनी त्यांच्या भ्रमणध्वनीमध्ये (मोबाईल) आरोग्य सेतू ॲप स्थापित करून अद्ययावत केले असल्याची नियोक्त्यांनी खात्री केली पाहिजे.

ई. सर्व कर्मचाऱ्यांकडून स्वतःच्या आरोग्याची स्वतःच देखरेख केली जात असल्याची आणि कोणताही आजार झाल्यास त्याबाबत तात्काळ कळवले जाण्याची खात्री करण्यात येईल.

१.७. जनजागृती

अ. प्रमुख प्रवेश द्वारे, ऑनलाईन, डिजिटल तिकीट विक्री ठिकाणे, तसेच प्रसाधनगृहे ,व-हांडे (लॉबी), यांसारखी सार्वजनिक ठिकाणे येथे 'काय करावे' आणि 'काय करू नये' याबाबतच्या सूचना लावण्यात येतील.

आ. परिवास्तूच्या आत आणि बाहेर मुखपट्टी लावणे, सुरक्षित अंतर राखणे व हातांची स्वच्छता राखणे यांबाबतच्या लोकोपयोगी घोषणा तसेच घ्यावयाची खबरदारी व करावयाच्या उपाययोजना यासंबंधातील विनिर्दिष्ट घोषणा ह्या, नाटय प्रयोगापुर्वी, मध्यंतरामध्ये आणि नाटयप्रयोगाच्या शेवटी करण्यात येतील.

इ. वरील ठिकाणांच्या बाहेरील बाजूस व आतील बाजूस ठळकपणे, कोविड-१९ च्या संबंधातील प्रतिबंधात्मक उपाययोजनांवरील भित्तीपत्रके/ उभे फलक/ ध्वनीफित वाजविण्यासाठी तरतुदी केल्या गेल्याच पाहिजेत .

ई. कोविड-१९ संदर्भातील जनजागृतीकरिता सार्वजनिक आरोग्य विभाग / संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांकडून "माझे कुटुंब माझी जबाबदारी" या मोहिमे संदर्भातील ध्वनीफित प्रयोगापूर्वी व मध्यतरांत वाजविण्यात याव्यातच.

१.८ वातानुकूलन/शीतन व्यवस्था

वातानुकूलनासाठी/ वायुवीजनासाठी केंद्रीय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मार्गदर्शक तत्त्वांचे अनुपालन करण्यात येईल, ज्यांमध्ये, इतर गोष्टींबरोबरच, पुढील बाबींवर भर दिलेला आहे:

क. सर्व वातानुकूलन उपकरणांचे तापमान २४ ते ३० अंश सेल्सिअस या मर्यादेत असले पाहिजे.

ख. सापेक्ष आर्द्रता ही ४० ते ७० टक्क्यांच्या मर्यादेत असली पाहिजे.

ग. शक्य होईल तितक्या प्रमाणात, हवेचे पुनर्चक्रण टाळण्यात यावे.

घ. शक्य होईल तेवढी, ताजी हवा मिळण्याची व्यवस्था असली पाहिजे.

ङ.. समोरासमोरील वायुवीजन हे, पुरेशा प्रमाणात असले पाहिजे.

**१.९ दृश्य लक्षणांबाबत कार्यवाही**

कोविड-१९ च्या संबंधातील लक्षणे किंवा बेफिकिर वर्तन यांबाबत प्रेक्षागार व्यवस्थापकाच्या/व्यवस्थापकांच्या आणि स्थानिक प्राधिका-यांच्या समन्वयाने काटेकोरपणे कार्यवाही करण्यात येईल.

**१.१० खाद्य-पेय पदार्थांचे क्षेत्र**

अ. खाद्यपदार्थ मागविण्यासाठी ,शक्य तितका, नाट्यगृह उपयोजक (थिएटर ॲप) / शीघ्र प्रतिसाद संकेतांक (क्यू.आर. कोड) इत्यादींचा वापर करण्यास ग्राहकांना प्रोत्साहन देण्यात येईल.

आ. खाद्य व पेय पदार्थांच्या क्षेत्रामध्ये, शक्य असेल तेथे तेथे, अनेक विक्री केंद्रे उपलब्ध करून देण्यात यावीत.

इ. प्रत्येक विक्री केंद्रावर सुरक्षित अंतर राखण्यासाठी, जमिनीवर चिकट-पट्ट्या (स्टिकर) वापरून एक- रांग पद्धतीचा अवलंब करावयाचा आहे.

ई. केवळ आवेष्टित खाद्यपदार्थ व पेय पदार्थ यांनाच परवानगी देण्यात येईल.

उ. सभागृहाच्या/प्रेक्षागाराच्या आत खाद्यपदार्थांची व पेय पदार्थांची पोचवणी करण्यास मनाई करण्यात येईल.

ऊ. खाद्यपदार्थांच्या व पेय पदार्थांच्या क्षेत्रात सुरक्षित अंतराचे पालन होत असल्याची व गर्दीला आळा घातला जात असल्याची खातरजमा व्यवस्थापनाकडून करण्यात येईल.

ए. खाद्यपदार्थांच्या व पेय पदार्थांच्या कचऱ्याची सुरक्षितपणे विल्हेवाट लावली जात असल्याबाबत परिवास्तूच्या व्यवस्थापनाकडून खातरजमा करण्यात येईल.

२. कोविड-१९ च्या व्यवस्थापनाबाबतचे राष्ट्रीय निदेश तसेच गृह कार्य मंत्रालय, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, महाराष्ट्र शासन इत्यादींनी जारी केलेली संबंधित मार्गदर्शक तत्त्वे यांचे सर्व कार्यांमध्ये व व्यवहारांमध्ये काटेकोरपणे पालन करण्यात येईल.

********************************

**Annexure – A**

(शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ८२२० /प्र.क्र. २११(भाग- १)/सां.का.४, दि. ११ ऑक्टोबर, २०२१ सहपत्र)

**Guidelines Principles**
**To restart Drama Theatres in Maharashtra**

# Part I

Standard Operating Procedures (SOPs)

1. **Scope**

1.1 This document outlines the Standard Operating Procedures (SOPs) in terms of various generic precautionary measures to be adopted in addition to specific measures to be ensured during performance at the Drama theatres to prevent spread of COVID-19.

1.2 Drama Theatres shall not be allowed to re-open in containment zones.

1.3 Drama Theatre activities shall be governed as per the prevalent guidelines of Department of Revenue & Forest, Disaster Management, Relief & Rehabilitation, and Public Health Department of Government of Maharashtra.

1.4 The concerned local authorities in consultation with the relevant stakeholders can further add any directions to these guidelines taking into consideration the local conditions.

2. **SOPs related to re-open Drama Theatres**

**A) Theatre / Stage Premises**

1. Floor markings at gates and appropriate places with social distancing norms
2. Designated people shall be allowed to operate curtain, backstage property etc.
3. It is advisory / recommendatory that the cast and crew should regularly have their medical check-ups.
4. Daily fumigation of all Sets and green rooms should be conducted.
5. Regular cleaning schedule for sets, washrooms and makeup rooms, ensure timely toilet sanitation.
6. Practice of wearing masks and face-shields to be made compulsory and hand sanitizers to be given to crew members. Artist who is playing role should wear mask till he enters on the stage. Strictly no guests, whosoever, be allowed at the greenrooms / set.
7. Strive for consistency regarding which pieces of equipment (music system/laptops/mics/lights etc) are handled by whom.
8. It is mandatory for all theatre Managements to take measures to keep the theatre clean/ sanitise/fumigate etc. regularly.

**B) Artist Management**

1. No guest should be allowed on the stage/ green rooms to meet the artist or other crew member before or after the show.
2. Make-up artist should wash their hands with soap / sanitizer before and after session.
3. Mix make-up on a disposable palette and possibly use only one brush, applicator etc. per actor. Possibly assign brush / combs to each actor so not to cross contaminate.
4. Clean hair brushes and combs and reusable make-up brushes with appropriate disinfecting solution.
5. It is advisory that every artist should have their own make-up kits.
6. It is advisory that PPE kit may be worn by make-up man at the time of makeup of artists to avoid person-to-person contact.
7. Face shield should be worn by the Make-up Artist.
8. Make-up room should be a minimum of 6 feet apart form the stage
9. It is advisory to use disposable make-up kits and brushes and dispose of the kit after each application.
10. Disinfect all sounds and lights equipment before and after each use.

11. Self-monitoring of health by all artist and reporting any illness at the earliest shall be ensured.

# Part II

## 1. General Guidelines to re-open Drama theatres in Maharashtra

The generic measures include public health measures that are to be followed to reduce the risk of transmission of COVID-19. These measures need to be observed by all (workers and visitors) at all times

**These include:**

I. Adequate physical distancing of at least 6 feet to be followed outside the auditoriums, common areas and waiting areas at all times.
II. Use of face covers/masks to be made mandatory at all times.
III. Availability of hand sanitizers, preferably in the touch-free mode, at entry and exit points as well as common areas within the premises.
IV. Respiratory etiquettes to be strictly followed. This involves strict practice of covering one's mouth and nose while coughing/sneezing with a tissue/handkerchief/flexed elbow and disposing off used tissues properly.
V. Self-monitoring of health by all and reporting any illness at the earliest to state and district helpline.
VI. Spitting shall be strictly prohibited.
VII. Aarogya Setu app to be installed on compatible devices and to be kept on throughout the day. All staff / artist to be fully vaccinated against covid (Two doses + 14 days interval since second dose. ), Except child artists, if any who shuold be having "safe" status on Arogya Setu App and frequently screened. Visitors should have safe status on Arogya Setu App or Fully vaccinated against covid.

### 1.1 Entry & Exit Points

A. Thermal screening of visitors/staff is to be carried out at entry points. Only asymptomatic individuals shall be allowed to enter the premises.
B. Provisions for hand sanitization should be made available at all entry points and in work areas.
C. Designated queue markers shall be made available for entry and exit of the audience from the auditorium and the premises.
D. The Exit should be done in a staggered row-wise manner to avoid crowding.
E. Sufficient time for interval between two acts shall be provided to ensure staggered entry and exit of the audience.
F. Multiple Entry and Exit points should be used to avoid crowding.

### 1.2 Seating Arrangements

a. The occupancy of Drama Theatre shall not be more than 50% of their total seating capacity.
b. Seating arrangement inside the auditorium of the Drama Theatre shall be made in such a way that adequate physical distancing is maintained. A model seating arrangement is attached at Annexure 1.
c. Seats that are "Not to be occupied" shall be marked as such during booking

(for both online booking and at the box office sale of tickets).

(Note. The "Not to be occupied "seats inside Drama Theatre should either be taped or marked with fluorescent markers to prevent people from occupying these seats so as to ensure adequate physical distancing at all times.)

**1.3 Physical Distancing Norms**

a. Proper crowd management in the parking lots and outside the premises—duly following physical distancing norms shall be ensured.
b. Number of people in the elevators shall be restricted, duly maintaining physical distancing norms.
c. Efforts shall be made to avoid overcrowding in the common areas, lobbies and washrooms during the intermission. Audience may be encouraged to avoid movement during the intermission. Longer intermissions may be used to allow audience seated in different rows of the auditorium to move in a staggered manner.

**1.4 Booking and Payments**

a. Digital no-contact transactions should be the most preferred mode for issue/verification/payments for tickets, food, and beverages, etc. by using online bookings, use of e-wallets, QR code scanners, etc.
b. Contact number shall be taken at the time of booking of tickets to facilitate contact tracing.
c. The purchase of tickets at the booking office shall be open throughout the day and advance booking shall be allowed to avoid crowding at the sale counters.
d. Sufficient number of counters at the booking office shall be opened with adequate physical distancing norms, to prevent crowding during physical booking of tickets
e. Floor markers shall be used for physical distancing during queue management at the booking office.

**1.5 Sanitization of the Premises**

a. Frequent sanitization of the entire premises, common facilities, and all points which come into human contact, e.g. handles, railings, etc. shall be ensured.
b. The auditorium shall be sanitized after every drama show.
c. Regular cleaning and disinfection of the box office, food and beverage areas, employee and staff lockers, toilets, public areas, and back office areas shall be ensured.
d. Measures for the safety of sanitization staff such as adequate provisions for rational use of gloves, boots, masks, PPE, etc. shall be undertaken.
e. Disinfection of the premises to be taken up if any person is found positive.

**1.6 Staff Related Measures**

a. Wearing of face cover for staff is mandatory at all workplaces and adequate stock of such face covers should be made available.
b. All employees who are at higher risk, i.e., older employees, pregnant employees, employees who have underlying medical conditions, to take extra precautions. They should preferably not be exposed to any front-line work requiring direct contact with the public.
c. With a view to ensure safety at the workplace, employers on best effort basis should ensure that Arogya Setu is installed and updated by all employees their mobile phones.
d. Self-monitoring of health by all employees/staff and reporting any illness at the earliest shall be ensured.

## 1.7 Public Awareness

a. DOs and Don'ts shall be communicated at prominent access points: Online sale points, digital tickets, public areas like lobbies, washrooms, etc.
b. Public Service Announcements on wearing mask, observing physical distancing and maintaining hand hygiene as well as specific announcements on the precautions and measures to be followed within and outside the premises shall be made before the performance, during intermission and at the end of the performance.
c. Provisions must be made for display of Posters/standees/AV media on preventive measures about COVID-19 prominently outside and inside of the venues.
d. Audio clip regarding Awareness of COVID-19 prepared by Public Health Department / respective local bodies on " **Maze Kutumb, Mazi Jababdari**" campaign must be run before the play start and during interval.

## 1.8 Air-Conditioning/Cooling

For air-conditioning/ventilation, the guidelines of CPWD shall be followed which, inter alia, emphasizes the following :

a. Temperature Setting of all air conditioning devices should be in the range of 24-30°C.
b. Relative humidity should be in the range of 40-70%.
c. Re-circulation of air to be avoided to the extent possible.
d. Intake of fresh air should be as much as possible.
e. Cross ventilation should be adequate.

## 1.9 Anti-stigma Behaviour

COVID-19 related stigmatization or unruly behaviour shall be dealt with strictly by coordination between the auditorium manager(s) and the local authorities.

## 1.10 Food and Beverage Area

a. Audience shall be encouraged to use Theatre apps/QR codes, etc. for ordering food as much as possible.
b. Multiple sale counters in food and beverage area be made available wherever possible.
c. One line systems to be followed using floor stickers to maintain physical distancing at every sale counter.
d. Any packaged food and beverages shall be allowed only outside the auditorium.
e. Delivery of food and beverage inside the hall/auditorium shall be prohibited.
f. Management shall ensure observance of physical distancing and preventing crowds in the food and beverages area.
g. Safe disposal of the food and beverage waste shall be ensured by the management of the premises.

2. The National Directives for COVID-19 Management and the relevant guidelines issued by the Ministry of Home Affairs, Ministry of Health & Family Welfare, Government of Maharashtra, etc. shall be strictly complied with during all activities and operations.

*-*-*-*-*-*-*

(शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ८२२० / प्र.क्र. २११(भाग-१)/सां.का.४,दि. ११ ऑक्टोबर, २०२१ सोबतचे परिशिष्ट-१)

<u>परिशिष्ट - १ ( Annexure -1)</u>

